अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-अ). संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मुदतपूर्व बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- इएसटी-१२१८/ प्र.क्र.३५/ राउशु-१,**
मंत्रालय, मुंबई-४०० ३२.
दिनांक:- २५ जून, २०१८.

वाचा:
१) आदेश, गृह विभाग क्रमांक:- इएसटी-२७१४/ प्र.क्र.२४४/ राउशु-१, दि.१०.०३.२०१६.
२) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांचे पत्र क्र. इएसटी ११२०१७/२-अ-१, दि.२.२.२०१८.

**शासन आदेश-**

अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-अ) या संवर्गातील खालील स्तंभ (२) येथील अधिकाऱ्याची प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालील स्तंभ (४) मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ..क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद | नवीन पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. एस. सी. मनपिया | अधीक्षक, राउशु, भंडारा | अधीक्षक, राउशु, यवतमाळ | रिक्त पदी |

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने सदरहू आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. बदली आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता आयुक्त, राउशु यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

अ) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेले अधिकारी त्यांच्या सध्याच्या पदावरून कार्यमुक्त होऊन रूजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. सदर अधिकाऱ्याला रूजू करून न घेतल्यामुळे काम न देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीत अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

ब) संबंधित अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

४. बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०६२५१६१६५२५३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2018.06.25 16:19:28 +05'30'

**( पु. हि. वागदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३) विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर (मार्फत आयुक्त, राउशु, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
६) संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
७) कार्यासन अधिकारी, राउशु-२ व राउशु-३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती (राउशु-१).